अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-“अ” संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यांबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
**शासन आदेश क्रमांकः बदली-बदली-११२०/प्र.क्र.५४/का.१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १० ऑगस्ट, २०२०.

## शासन आदेश:-

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४(१) ते (३) मधील तरतुदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उप संचालक, गट-“अ” (S-२० : ५६,१००-१,७७,५००) या संवर्गातील खाली नमूद अधिकाऱ्यांची सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | श्री.मु.रा.वाडेकर,<br>जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती कार्यालय,<br>जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे | जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन विकास समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ<br>(श्री.गि.के.शास्त्री यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदावर) |

२. श्री.मु.रा.वाडेकर यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती ही अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येणार नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. संबंधित कार्यालयप्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून त्या अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच बदली केलेल्या पदावर वरील अधिकारी त्यांना देय/ अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधी उपभोगुन रुजू न झाल्यास संबंधित कार्यालयाने त्यांचे वेतन काढू नये. कोणत्याही परिस्थितीत प्रतिक्षाधीन कालावधी नियमित करण्यात येणार नाही. यासंदर्भात वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-सेनिवे-१००१/१३०/सेवा-४,

दिनांक २/०६/२००३ मधील परिशिष्ट-१, नियम ९(१४)(एफ) शेरा क्रमांक २ नुसार सक्तीचा प्रतिक्षा कालावधी निर्माण होण्यास जबाबदार ठरणाऱ्या संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

४. संबंधित कार्यालयप्रमुख यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास tushar.hirlekar@nic.in या ई-मेल पत्त्यावर तसेच संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना कळवावा.

५. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यावाही सात दिवसांच्या आत करावी. अद्ययावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्यांच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच, अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयप्रमुखांची राहील.

६. श्री.मु.रा.वाडेकर यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

७. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून; त्याचा संकेताक २०२००८१०१३०५४१८११६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6dd848a31422ed36ba4503d4744b6dc20833c851babace12b16b7bba3f67cca2, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2020.08.11 18:57:12 +05'30'

**( तु. पु. हिर्लेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. मा.मुख्यमंत्री/ मा.उप मुख्यमंत्री (नियोजन)/ मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
५. आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, नाशिक/ अमरावती
६. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी यांचे कार्यालय, धुळे/ यवतमाळ
७. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

८. सर्व सह सचिव/ उप सचिव/ विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सह संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
१०. सर्व उप आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
११. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, धुळे/ यवतमाळ
१३. श्री.मु.रा.वाडेकर, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे
१४. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. निवड नस्ती.